परिवीक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी/ गट विकास अधिकारी गट-अ यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणाकरिता जिल्हा वाटप करण्याबाबत.
<u>राज्यसेवा परीक्षा-२०१९,सीपीटीपी-७.</u>

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मविसे १०२१/२०२१/प्र.क्र.११४/आस्था-३(अ)**
बांधकाम भवन, २५ मर्झबान रोड, मुंबई ४००००१
तारीख: ४ जानेवारी,२०२२.

<u>वाचा:-</u>

१. शासन निर्णय,सामान्य प्रशासन विभाग क्र.टिआरएन-२०१३/प्र.क्र.८४/१३/१२-अ दिनांक २०.१.२०१४
२. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग. क्र.टिआरएन-१११४/ प्र.क्र.८३/ १८-ब दिनांक ३.११.२०१४
३. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग. क्र.टिआरएन-०२१७/ प्र.क्र.१०/सीपीटीपी, दिनांक १३.११.२०१७
४. शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग. क्र.टिआरएन-०२१७/ प्र.क्र.१०/सीपीटीपी, दिनांक १८.८.२०२१
५. सामान्य प्रशासन विभाग,कार्यालयीन आदेश क्र. टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९ /सीपीटीपी-अ, दिनांक २४.१२.२०२१.
६. सामान्य प्रशासन विभाग,शासन पत्र क्र. टिआरएन-१०२१/प्र.क्र.२९/सीपीटीपी-अ, दिनांक २९.१२.२०२१.

**<u>प्रस्तावना:-</u>**

महाराष्ट्र लोकसेवा आयोगाकडून राज्यसेवा परीक्षेमधून सरळसेवेने नियुक्त होणाऱ्या गट-अ आणि गट-ब मधील अधिकाऱ्यांना एकत्रित परिवीक्षाधीन प्रशिक्षण देण्याबाबतचा निर्णय शासनाने उपरोक्त संदर्भ क्र.१ येथील शासन निर्णयान्वये घेतला आहे. सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.४ व ५ अन्वये कळविल्यानुसार राज्यसेवा मुख्य परीक्षा-२०१९ मधून शिफारस प्राप्त झालेल्या महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ मधील परिवीक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी/गट विकास अधिकारी गट-अ यांचे जिल्हा संलग्नता प्रशिक्षण दिनांक १७.१.२०२२ पासून सुरु होणार आहे. सदर प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटपाबाबत मार्गदर्शक सूचना सामान्य प्रशासन विभागाने संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयान्वये निर्गमित केल्या आहेत. सामान्य प्रशासन विभागाने संदर्भाधीन क्र.३ व ४ अन्वये दिलेल्या सूचना विचारात घेऊन प्रशिक्षणार्थींना जिल्हास्तरावरील ४ आठवडे साठी खातेनिहाय जिल्हा संलग्नता प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय: -</u>**

सामान्य प्रशासन विभागाच्या उपरोक्त संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ मधील परिवीक्षाधीन अधिका-यांना खातेनिहाय जिल्हा संलग्नता

प्रशिक्षणासाठी जिल्हा वाटप करण्यांत येत आहे. त्यानुसार महाराष्ट्र विकास सेवा, गट-अ संवर्गातील परिवीक्षाधीन उपमुख्य कार्यकारी अधिकारी/गट विकास अधिकारी गट-अ मधील १९ परिवीक्षाधीन अधिकाऱ्यांना परिशिष्ट-अ येथे त्यांच्या नांवासमोर नमूद केलेल्या जिल्हा परिषदेमध्ये प्रशिक्षणासाठी वाटप करण्यात येत आहे.

२. संबंधित जिल्हा परिषदेचे मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेकडे परिविक्षाधीन अधिकारी यांनी दिनांक १७.१.२०२२ (म.पु.) रोजी रुजू व्हावे व रुजू झालेबाबतचा अहवाल न चुकता संबंधित मुख्य कार्यकारी अधिकारी यांचेमार्फत शासनास सादर करावा.

३. सीपीटीपी-७ च्या तुकडीतील परिवीक्षाधीन अधिका-यांना वेतन व इतर अनुषंगिक भत्ते प्राप्त व्हावेत याअनुषंगाने संबंधित जिल्हा परिषदांनी या अधिका-यांची सेवार्थ प्रणालीमध्ये नोंदणी करणे, त्यांचे डीसीपीएस करीता क्रमांक मिळविणे तसेच त्यांच्या वेतनासाठी आहरण व संवितरण अधिकारी नियुक्त करणे व सेवापुस्तक तयार करणे इ. कार्यवाही प्रशिक्षणाच्या सुरुवातीस जिल्हा संलग्नतेच्या एका महिन्याच्या कालावधीत ( दिनांक १७/०१/२०२२ ते दिनांक ११/०२/२०२२ ) करावी.

४. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र. ३ व ४ येथील दि.१३.११.२०१७ व दि.१८.८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये एकत्रित परिविक्षाधीन प्रशिक्षण कार्यक्रम दरम्यान रजांबाबतचे धोरण निश्चित करण्यात आले आहे. या धोरणातील तरतुदीस अनुसरून जिल्हा संलग्नता या टप्प्यामध्ये परिविक्षाधीन उमेदवारांच्या रजेबाबतचा निर्णय संबंधित जिल्हास्तरावरील अधिकारी यांनी घ्यावा.

५. सदर प्रशिक्षणाबाबतची कार्यक्रम पुस्तिका स्वतंत्रपणे कळविण्यात येणार आहे. सदर कार्यक्रम पुस्तिकेनुसार प्रशिक्षण पूर्ण करण्यात यावे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२२०१०५०९४०१३४३२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pawar Sanjay Rajaram

Digitally signed by Pawar Sanjay Rajaram
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Public Works Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a00eeebdc51e1ffb7d6747ffbcbbba333cca001d95359cbb1a2217118b054a9e, serialNumber=65afd54f6450ab9da3327c361bfc1f5f92e629b78ed9a49381d3c9751f71254a, cn=Pawar Sanjay Rajaram
Date: 2022.01.05 12:07:35 +05'30'

**( संजय पवार )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रत-**

१. प्रधान सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. सचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. सर्व विभागीय आयुक्त.
४. महासंचालक, यशदा , पुणे
५. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
६. मुख्य लेखा व वित्त अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

७. सर्व कोषागार अधिकारी.
८. महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
९. मुख्य लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, नवी मुंबई.
१०.अर्थसंकल्प-३, १६ व व्यय-१५, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
११.कार्यासन-वित्त-१, आस्था-३, वित्त-९ ग्राम विकास विभाग,मंत्रालय, मुंबई.
१२.निवडनस्ती, आस्था-३(अ)

## परिशिष्ट "अ"

राज्यसेवा (मुख्य) परीक्षा-२०१९ मधून शिफारसप्राप्त झालेल्या उपमुख्य कार्यकारी अधिकारी / गट विकास अधिकारी, गट-अ पदावरील १९ अधिकाऱ्यांना ४ आठवडयांचे (दिनांक १७.१.२०२२ ते दिनांक ११.२.२०२२ या कालावधीसाठी) "खातेनिहाय जिल्हा संलग्नता" या प्रशिक्षणासाठी पुढीलप्रमाणे त्यांच्या नावासमोर दर्शविलेली जिल्हा परिषद वाटप करण्यात येत आहे.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नांव | स्व महसुली विभाग | स्व- जिल्हा | प्रशिक्षणासाठी देण्यांत आलेली जिल्हा परिषद |
|---|---|---|---|---|
| १ | श्री.कासोदे अभिषेक दिपक | नाशिक | जळगाव | अमरावती |
| २ | श्री.कदम योगेश विलास | पुणे | सातारा | लातूर |
| ३ | श्री.शिंदे विक्रमसिंह प्रकाशराव | पुणे | सांगली | धुळे |
| ४ | श्री.कदम राजेश विलास | पुणे | सातारा | जळगाव |
| ५ | श्री.शेंडगे प्रदिप रामदास | पुणे | पुणे | अहमदनगर |
| ६ | श्री.सावंत अजिंक्य दत्तात्रय | पुणे | पुणे | रायगड |
| ७ | श्री.मंडलिक गणेश कोंडिराम | नाशिक | अहमदनगर | सातारा |
| ८ | श्री.पखारे अभिजित गहिनीनाथ | औरंगाबाद | बीड | पुणे |
| ९ | श्री.मुंडे अमितकुमार ज्ञानेश्वर | औरंगाबाद | उस्मानाबाद | अकोला |
| १० | श्री.वाकचौरे सुहास मारुतराव | नाशिक | नाशिक | औरंगाबाद |
| ११ | श्री.पायघन माधव बाबुराव | औरंगाबाद | जालना | बुलढाणा |
| १२ | श्री.सूर्यवंशी अजिंक्य शहाजी | नाशिक | अहमदनगर | सांगली |
| १३ | श्री.गुंड विवेक मारोतराव | नाशिक | अहमदनगर | रत्नागिरी |
| १४ | श्रीम.मुळीक ज्योत्स्ना प्रकाश | औरंगाबाद | उस्मानाबाद | सोलापूर |
| १५ | श्रीम.शिंदे सुस्मिता शहाजीराव | पुणे | सांगली | कोल्हापूर |
| १६ | श्रीम.राणे पूनम भगवान | नाशिक | जळगाव | ठाणे |
| १७ | श्रीम.लाड स्नेहल संजय | पुणे | कोल्हापूर | नाशिक |
| १८ | श्री.जाधव पुंडलिक विश्वनाथ | नाशिक | जळगाव | भंडारा |
| १९ | श्री.तोतेवाड प्रफुल्ल प्रकाशराव | औरंगाबाद | परभणी | वाशीम |